**केंद्र पुरस्कृत समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण व शिक्षक शिक्षण) उपयोजनेचा सर्वसाधारण (General) घटकातील पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत. (केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा).**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- समग्र २०२४/प्र.क्र. ९३/ एसडी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक: ०५ ऑगस्ट २०२४.

**वाचा :-**

१) राज्य प्रकल्प संचालक (समग्र शिक्षा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र, क्र. मप्राशिप/ सशि/ १ला हप्ता/Rec, Non-Rec/(SAP, GEN, SC, ST) निधी मागणी/२०२४-२५/ २१७१, दि.२९.०७.२०२४.
२) वित्त विभागाचे परिपत्रक, दि. ०५.१२.२०२३, दि. ०८.१२.२०२४ व दि.२५.०७.२०२४.
३) केंद्र शासनाचे आदेश, दि.२५.०७.२०२४

**प्रस्तावना :-**

राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील पत्रान्वये समग्र शिक्षा योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२४-२५ करीता पहिल्या हप्त्याचा केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात समग्र शिक्षा योजनेच्या सर्वसाधारण (General) या लेखाशिर्षाखाली केंद्र हिस्सा व त्यास समरूप राज्य हिस्सा वितरीत व खर्च करावयाचा आहे. त्यानुषंगाने वित्त विभागाच्या दि.२५.०७.२०२४ रोजीच्या सुचनांनुसार समग्र शिक्षा योजनेंतर्गत सन २०२४-२५ या वर्षात सर्वसाधारण (General) उपयोजनेचा केंद्र हिस्सा (६०%) २२०२ आय ६२१, ३१-सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली रु. १७७,८१,८९,०००/- इतका निधी तसेच सदर निधीच्या समरूप राज्य हिस्सा (४०%) २२०२ आय ६१२, ३१-सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली रु.११८,५४,५९,३३३/- असे एकूण रु.२९६,३६,४८,३३३/- इतका निधी मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाने समग्र शिक्षा योजनेसाठी सर्वसाधारण (General) या घटकाकरीता वितरीत केलेला निधी केंद्र हिस्सा "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६- शिक्षक व इतर सेवा, (००) (०२) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (केंद्र हिस्सा ६० टक्के), (२२०२ आय ६२१), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली रु. १७७,८१,८९,०००/- इतका निधी तसेच सदर निधीच्या समरूप राज्य हिस्सा "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६- शिक्षक व इतर

सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण), (राज्य हिस्सा ४० टक्के), (२२०२ आय ६१२), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली रु.११८,५४,५९,३३३/- असे एकूण रु. २९६,३६,४८,३३३/- इतका निधी राज्य प्रकल्प संचालक ( समग्र शिक्षा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांचेकडे समग्र शिक्षा योजनेच्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये सुपुर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अनुदान सशर्त अनुदान असुन यापुर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. या अनुदानाच्या अटी व शर्ती सदर शासन निर्णयात नमुद केल्या आहेत.

३. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २५.०७.२०२४ च्या परिपत्रकामधील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोख/लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह/उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरित करुन निधी समग्र शिक्षा यांच्या बँक खात्यात जमा करावा.

४. समग्र शिक्षा योजनेतील सर्व खर्च हा Single Nodal Account (SNA) मधून करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाचे दि.२५.०७.२०२४ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार व सन २०२४-२५ च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केलेल्या समग्र शिक्षा योजनेच्या चालू योजनांच्या आवर्ती/अनावर्ती बाबीसाठी खर्च करावा. आवर्ती व अनावर्ती बाबींचा सविस्तर तपशील सोबत **परिशिष्ट "अ"** येथे जोडला आहे.

६. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २५.०७.२०२४ चे परिपत्रकामधील सूचनांनुसार तसेच खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल, याची दक्षता घ्यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक दि. २५.०७.२०२४ अन्वये दिलेल्या सुचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०५१४४४२५२५२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.08.05 14:58:57 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३.
११. सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग).
१२. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१३. सह सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१५. अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय , मुंबई.
१७. निवड नस्ती (एसडी-१).

**शासन निर्णय क्रमांक:- समग्र २०२४/प्र.क्र. ९३/एसडी-१, दि. ०५.०८.२०२४ सोबतचे "परिशिष्ट-अ"**

केंद्र पुरस्कृत समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण व शिक्षक शिक्षण) उपयोजनेचा सर्वसाधारण (General) व स्वच्छता ॲक्शान प्लॅन (SAP) घटकातील पहिल्या हप्त्याचा केंद्र हिस्सा व राज्य हिस्साकरीता वितरीत करावयाच्या निधीचे आवर्ती व अनावर्ती बाबींनुसार तपशील:-

| अ. क्र. | बाब | केंद्र शासन आदेश दिनांक | आवर्ती | | अनावर्ती | | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र | राज्य | केंद्र | राज्य | |
| १ | **प्राथमिक शिक्षण** | २५.०७.२०२४ | १४०,२५,५३,००० | ९३,५०,३५,३३३ | २०,७७,२४,००० | १३,८४,८२,६६७ | २६८,३७,९५,००० |
| | स्वच्छता ॲक्शान प्लॅन (SAP) | २५.०७.२०२४ | ९,७८,४४,००० | ६,५२,२९,३३३ | ० | ० | १६,३०,७३,३३३ |
| **एकूण (अ)** | | | **१५०,०३,९७,०००** | **१००,०२,६४,६६६** | **२०,७७,२४,०००** | **१३,८४,८२,६६७** | **२८४,६८,६८,३३३** |
| २ | **माध्यमिक शिक्षण (ब)** | २५.०७.२०२४ | ० | ० | ४,०८,६८,००० | २,७२,४५,३३३ | ६,८१,१३,३३३ |
| ३ | **शिक्षक शिक्षण (क)** | २५.०७.२०२४ | २,९२,००,००० | १,९४,६६,६६७ | ० | ० | ४,८६,६६,६६७ |
| **एकूण (अ+ब+क)** | | | **१५२,९५,९७,०००** | **१०१,९७,३१,३३३** | **२४,८५,९२,०००** | **१६,५७,२८,०००** | **२९६,३६,४८,३३३** |

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.08.05 14:59:21 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**